**शैक्षणिक वर्ष २०२४-२५**
**नवीन महाविद्यालयांना अंतिम**
**मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : HTED-२९०६६(११)/१४/२०२४/८११२२४-MHT-(HE-४)**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १५ जुलै, २०२४

**संदर्भ:**

१) शासन आदेश क्रमांक न्यायाप्र-२०१८/(११६/१८)/मशि-४, दिनांक २०.०४.२०२२

२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी २०१७/(२९/१७)/मशि-४, दिनांक १५.०९.२०१७

३) याचिका क्र. ६२५६/२०२२ प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई यांचे दिनांक २१.०२.२०२४ रोजीचे आदेश.

४) दिनांक ५.०७.२०२४ रोजी अधिसूचित करण्यात आलेला महाराष्ट्र अधिनियम क्र.XXIV/२०२४, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ (सुधारणा)अधिनियम, २०२४.

**शासन निर्णयः-**

शैक्षणिक वर्ष २०२२-२०२३ करीता संदर्भ क्र. १ येथील आदेशान्वये १) जयवंत शिक्षण प्रसारक मंडळाचे राजर्षी शाहू वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, वाघोली, ता. हवेली, जि. पुणे २) श्री संत तुकाराम शिक्षण संस्था, चंदननगर, ता. हवेली, जि. पुणे व ३) लोकसेवा प्रतिष्ठाणचे लोकसेवा वरिष्ठ महाविद्यालय, फुलगाव, ता. हवेली, जि. पुणे या नवीन महाविद्यालयांना इरादापत्र मंजूर करण्यात आले होते.

सदर आदेशाविरूध्द जागृती फाऊंडेशन, पुणे या संस्थने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई येथे याचिका क्र. ६२५६/२०२२ दाखल केली होती. सदर याचिकेमध्ये मा. न्यायालयाने दिनांक २५.०५.२०२२ रोजी खालीलप्रमाणे आदेश दिले होते.

Issue notice to Respondents returnable on १५th June, २०२२. Learned AGP waives notice for Respondents No. १ to ३.

**In the meantime, the operation of impugned order dated २०th April, २०२२ is stayed.**

तद्नंतर, याचिका क्र. ६२५६/२०२२ निकाली काढतांना मा. उच्च न्यायालयाने दिनांक २१.०२.२०२४ रोजी खालीलप्रमाणे आदेश दिले आहेत:-

To conclude, in view of above discussion this Court is not inclined to exercise its jurisdiction under Article २२६ of the Constitution of India in the facts of the present case and, therefore, the writ petition is dismissed with no order as to costs.

Insofar as the Writ Petition No.९६९४ of २०२२ is concerned, the contentions being similar, the reasons given in the order in Writ Petition No.६२५६ of २०२२ would

equally apply and, therefore, on the same reasons, Writ Petition No.९६९४ of २०२२ is also dismissed with no order as to costs.

At this stage, the counsel for the petitioner requested for stay of the operation of this judgment for a period of two weeks since the interim protection was in operation.

We accept such request and stay the operation of this judgment for a period of two weeks.

उपरोक्त आदेशात मा. उच्च न्यायालयाने याचिकादारांची मागणी अमान्य करून याचिका निकाली काढली आहे.

१) जयवंत शिक्षण प्रसारक मंडळाचे राजर्षी शाहू वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, वाघोली, ता. हवेली, जि. पुणे २) श्री संत तुकाराम शिक्षण संस्था, चंदननगर, ता. हवेली, जि. पुणे व ३) लोकसेवा प्रतिष्ठाणचे लोकसेवा वरिष्ठ महाविद्यालय, फुलगाव, ता. हवेली, जि. पुणे या महाविद्यालयांना दिनांक २०.०४.२०२२ रोजी प्रदान करण्यात आलेले इरादापत्र ३१ जानेवारी २०२३ पर्यंत वैध होते. तथापि, याचिका क्र. ६२५६/२०२२ मधील दिनांक २५.०५.२०२२ चे स्थगिती आदेश आता दिनांक २१.०२.२०२४ रोजीच्या आदेशान्वये रिक्त झाले आहेत. सबब, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करीता सदर महाविद्यालयांचे अंतिम मान्यतेचे अनुपालन अहवाल शासन निर्देशानुसार विद्यापीठांनी शासनास शिफारशीत केले आहे.

संदर्भ क्र. २ येथील दिनांक १५.०९.२०१७ च्या शासन निर्णयामधील परिशिष्ट "क" मध्ये विहित करण्यात आलेल्या निकषानुसार सदर प्रस्तावांची तपासणी करण्यात आली असून महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (छ) व त्याखालील परंतुकानुसार शासनास असलेल्या अधिकारांचा वापर करुन सोबतच्या विवरणपत्र - अ मध्ये नमूद केलेल्या ०३ नवीन महाविद्यालयांना शासनाने विहित केलेल्या खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** अंतिम मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्तीः-**

१) महाविद्यालयांची मान्यता ही शासनाच्या प्रचलित धोरणानुसार **कायम विनाअनुदानित तत्वावर** राहील. तसेच सदर महाविद्यालयांच्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांचे वेतन व वेतनेतर दायित्व शासनावर असणार नाही.

२) नवीन महाविद्यालय / संस्थेने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत, असे हमीपत्र रु.१००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँम्प पेपरवर सादर करावे.

३) महाविद्यालयाने, संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक / कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र प्रमाणित करून विद्यापीठास द्यावे.

४) विभागीय सहसंचालकांचे उक्त प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय तसेच विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ऑफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन, २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित केलेल्या निकषांची पूर्तता केल्याशिवाय, संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

५) महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

६) मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयाने सक्षम प्राधिकरणाने विहीत केलेल्या कालमर्यादेत नॅक मुल्यांकन करुन घेण्यासाठी प्रयत्न करावा व याबाबत पाठपुरावा करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठाची राहील.

७) महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (छ) खालील पंरतुकानुसार प्राप्त अधिकारात नवीन महाविद्यालयांच्या प्रस्तावातील नॅक व अन्य त्रुटींच्या पूर्ततेची खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठाची राहील. त्याचप्रमाणे सदर त्रुटी पुर्तता ६ महिन्यांच्या आत न झाल्यास सदर मान्यता आपोआप रद्द होईल. याबाबत आवश्यक कार्यवाही करण्याची दक्षता संबंधित विद्यापीठांनी घ्यावी. सदर कारणास्तव मान्यता रद्द झाल्यास विद्यार्थ्यांच्या समायोजनाची कार्यवाही संबंधित सहसंचालक, उच्च शिक्षण यांनी करावी.

८) ज्या शैक्षणिक वर्षासाठी महाविद्यालय सुरु करण्यास परवानगी देण्यात आलेली आहे, त्या शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे आवश्यक आहे. संलग्निकरण किंवा इतर शिखर संस्था/केंद्रीय नियामक मंडळे यांची परवानगी मिळण्यास विलंब झाल्यामुळे जर महाविद्यालय त्या शैक्षणिक वर्षात सुरु होऊ शकले नाही तर, त्या शैक्षणिक वर्षांच्या पुढील शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे अनिवार्य राहील. अन्यथा दिलेली परवानगी आपोआप रद्द समजण्यात येईल.

९) विद्यापीठांनी शासन निर्णयाचे अवलोकन केल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

१०) संबंधित विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या नवीन महाविद्यालयांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर महाविद्यालयांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर महाविद्यालयांची मान्यता रद्द समजून तसे विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत आणि ते शासन व संबंधित विद्यापीठाकडे पाठवावेत.

२. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ मधील तरतूदीनुसार नवीन महाविद्यालयांना मान्यता देण्याबाबतची अंतिम मुदत १५ जून अशी आहे. परंतु शासन अधिसूचना दि. ०५.०७. २०२४ अन्वये सदर मुदत १५ जुलै पर्यंत वाढविण्यात आली आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७१५११२३२९९००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.07.16 00:22:27 +05'30'

(अशोक मांडे)
**उप सचिव, महराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री ,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य.
९) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सर्व संबंधित विभागीय सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
११) निवडनस्ती (मशि-४).

**शासन निर्णय क्रमांक : HTED-२९०६६(११)/१४/२०२४/८११२२४-MHT-(HE-४)**
**दिनांक १५ जुलै, २०२४ सोबतचे**

**विवरणपत्र - अ**

| अ.क्र. | संस्था/ प्रस्तावित महाविद्यालयाचे नांव | प्रस्तावित विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे** | |
| १ | जयवंत शिक्षण प्रसारक मंडळाचे राजर्षी शाहू वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, वाघोली, ता. हवेली, जि. पुणे. | १.वाणिज्य व व्यवस्थापन- वाणिज्य<br>२.विज्ञान व तंत्रज्ञान- विज्ञान |
| २ | श्री संत तुकाराम शिक्षण संस्था, चंदननगर, ता. हवेली, जि. पुणे. | १. मानवविज्ञान- कला<br>२.वाणिज्य व व्यवस्थापन- बी.कॉम.<br>३.विज्ञान व तंत्रज्ञान- विज्ञान (महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (छ) खालील परंतुकान्वये) |
| ३ | लोकसेवा प्रतिष्ठाणचे लोकसेवा वरिष्ठ महाविद्यालय, फुलगाव, ता. हवेली, जि. पुणे. | १. मानवविज्ञान- कला<br>२.वाणिज्य व व्यवस्थापन- वाणिज्य<br>३.विज्ञान व तंत्रज्ञान- विज्ञान (महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (छ) खालील परंतुकान्वये) |

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0 90e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382 FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.07.16 00:22:46 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महराष्ट्र शासन**